“सामाजिक वनीकरण मजूर” संवर्गातील १३४ अधिसंख्य वनमजूर पदांना (आकृतीबंधाबाहेरील) सन २०२५-२०२६ मध्ये पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आस्था-२०२५/१९२/प्र.क्र.३५/फ-१२,**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ०६ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. आस्था-२०२४/२४९/प्र.क्र.२६/फ-१२, दि.१९.०९.२०२४
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ३.०३.२०२५.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख),म.रा., नागपूर यांचे कार्यालय यांचे पत्र क्र. कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.५५(२४-२५)/५४६/२५-२६, दि. १४.०२.२०२५.

**प्रस्तावना :-**

महसूल व वन विभागाच्या संदर्भ, क्र. १ येथील शासन निर्णयान्वये “सामाजिक वनीकरण मजूर” संवर्गातील १९७ अधिसंख्य पदांना दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ या कालावधीसाठी मान्यता देण्यात आली होती. सदर मान्यता संपुष्टात आली असल्याने, अधिसंख्य १३४ वनमजूर पदांना दि. ०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यत मुदतवाढ देण्याचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

महसूल व वन विभागाच्या संदर्भ, क्र. १ येथील शासन निर्णयान्वये “सामाजिक वनीकरण मजूर” संवर्गातील १९७ अधिसंख्य पदांना दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली. सदरची मुदतवाढ देताना “मुदतवाढ दिलेली अधिसंख्य पदे, निवृत्ती अथवा अन्य कोणत्याही कारणामुळे रिक्त झाली असल्यास सदर पदे आपोआपच व्यपगत होतील” या अटीच्या अधीन राहून मान्यता देण्यात आली होती. सदर मान्यता दि. २८.०२.२०२५ रोजी संपुष्टात आली असल्याने, प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये अधिसंख्य १३४ वनमजूर पदांना दि. ०१.०३.२०२५ ते दि.२८.०२.२०२६ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये “सामाजिक वनीकरण मजूर” संवर्गात कार्यरत असलेल्या एकूण १३४ अधिसंख्य वनमजूर पदांनादि. ०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यत खालील अटीच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे:-

अ) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विविव्ही-१०९७/प्र.क्र.२६/९७/अर्थसंकल्प-१९, दि. २०.१२.१९९७ नुसार अस्थायी पदांना मुदतवाढ देताना कर्मचारी वृंदाच्या मानकाचे पुनर्विलोकन योजना / कार्यक्रम यांचा आढावा घेण्यात यावा.

आ) जी पदे ठराविक कालावधीसाठी मंजूर करण्यात आली आहेत, अशी पदे ठराविक कालावधी संपल्यानंतर निरसित करण्यात यावीत.

इ) अधिसंख्य पदे निवृत्ती अथवा अन्य कोणत्याही कारणामुळे रिक्त झाली असल्यास सदर पदे आपोआपच व्यपगत होतील.

४. सदर पदासाठी येणारा खर्च मागणी क्रमांक सी-०७, २४०६ वनीकरण व वन्यजीवन १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, (१२) (०२) वन कामगारांसाठी अधिसंख्य पदांची निर्मिती, नियमित आस्थापनेवर रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (अनिवार्य) (२४०६ ८५७१) (आकृतिबंधाबाहय) या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०६१५११४३८९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHAGWAN MARUTI SAWANT

Digitally signed by BHAGWAN MARUTI SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C7DBA1C6B5F7AB2A6CABC4F7EAD8CFA74F8F7A0FADCAC76D8F1CF22569F16BD3, cn=BHAGWAN MARUTI SAWANT
Date: 2025.03.06 15:13:39 +05'30'

**( भगवान सावंत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक)
६) वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे/ ठाणे/ औरंगाबाद/ नाशिक/अमरावती/नागपूर.
७) सर्व विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण विभाग
८) महालेखापाल १-२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
९) सर्व कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१०) अवर सचिव (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
११) निवडनस्ती, महसूल व वन विभाग, कार्यासन फ-१२

**महसूल व वन विभाग,**

शासन निर्णय, क्रमांक :- आस्था-२०२५/१९२/प्र.क्र.३५/फ-१२.

दिनांक :- ०६ मार्च, २०२५ चे सहपत्र (योजनेत्तर कर्मचारीवृंद)

प्रपत्र-१

**अधिसंख्य पदांचे विवरण**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | मुख्यलेखाशिर्ष | योजना/उपशिर्ष |
|---|---|---|---|---|
| १ | सामाजिक वनीकरण अधिसंख्य मजूर | १३४ | मागणी क्र.सी-०७, २४०६ वनीकरण व वन्यजीवन | १०१ वनसंरक्षण, विकास व पुर्ननिर्मिती, (१२) (०२) वन कामगांरासाठी अधिसंख्य पदांची निर्मिती, नियमित आस्थापनेवर रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (योजनेत्तर) (२४०६ ८५७१) |

BHAGWAN
MARUTI SAWANT

Digitally signed by BHAGWAN MARUTI SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C7DBA1C6B5F7AB2A6CABC4F7EAD8CFA74F8F7A0FADCAC76D8F1CF22569F16BD3, cn=BHAGWAN MARUTI SAWANT
Date: 2025.03.06 15:14:03 +05'30'

**(भगवान सावंत)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**